**राज्य योजना सन २०१९-२०२०**
**निसर्ग संरक्षण व वन्यपशू व्यवस्थापन (२४०६ ०७७५) या योजनेतर्गत निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांकः डब्ल्यूएलपी : ०५.१९/प्र.क्र. १४६ /फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०७ नोव्हेंबर, २०१९

वाचा :-

१. वित्त विभागाचे, शासन परिपत्रक, क्रमांक : अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०१९.
२. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी-०५.१९/प्र.क्र. १४६ /फ-१, दिनांक १६.०५.२०१९.
३. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी-०५.१९/प्र.क्र. १४६ /फ-१, दिनांक २९.०५.२०१९.
४. वित्त विभागाचे, शासन परिपत्रक, क्रमांक : अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८.०७.२०१९.
५. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी-०५.१९/प्र.क्र. १४६ /फ-१, दिनांक ३०.०७.२०१९.
६. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी-०५.१९/प्र.क्र. १४६ /फ-१, दिनांक १९.०८.२०१९.
७. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.१६/८९६/१९-२०, दिनांक २७.०८.२०१९.
८. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.१६/९४५/१९-२०, दिनांक ०५.०९.२०१९.
९. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.१६/११५४/१९-२०, दिनांक १९.१०.२०१९.

**प्रस्तावना :-**

सन २०१९-२०२० मध्ये राज्यस्तरीय योजनेतंर्गत निसर्ग संरक्षण व वन्यपशू व्यवस्थापन (२४०६ ०७७५) या लेखाशिर्षांतर्गत रुपये १५००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ च्या परिपत्रकात **"सन २०१९-२०२० या वर्षाकरीता प्रस्तावित केलेल्या विनियोजनांची अनुसूच या अर्थसंकल्पीय प्रकाशनातील "स्तंभ क्रमांक ५ व ६" यामध्ये विभागांना दर्शविलेल्या रकमांचे अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर (BEAMS) वाटप करण्यात येत असून सदर तरतूदींची एप्रिल ते जुलै, २०१९ पर्यतची मासिक निधी विवरणपत्रे अर्थसंकल्प अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) प्रशासकीय विभागाकडून नोंदविण्यात आल्यांनतर विभागास आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमावरील खर्चाचा निधी (लेखानुदान) वितरीत केला जाईल. त्याचे तात्काळ वाटप करावे."** असे नमूद करण्यात आले आहे.

३. संदर्भ क्रमांक १ च्या परिपत्रकात नमूद केल्याप्रमाणे निसर्ग संरक्षण व वन्यपशू व्यवस्थापन (२४०६ ०७७५) या लेखाशिर्षाअंतर्गत अर्थसंकल्प अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) वर रु. ५००.०० लक्ष निधी माहे एप्रिल ते जुलै, २०१९ पर्यत वितरणासाठी उपलब्ध करुन देण्यात आले होते. त्यानुसार संदर्भ क्रमांक २ व ३ च्या शासन निर्णयान्वये उपरोक्त लेखाशिर्षाअंतर्गत रु. ५००.०० लक्ष निधी वितरीत करण्यात आला आहे.

४. आता संदर्भ क्रमांक ४ च्या परिपत्रकात **“सन २०१९-२०२० च्या अर्थसंकल्पीय तरतूदींची मासिक निधी विवरणपत्रे अर्थसंकल्प अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) प्रशासकीय विभागाकडून नोंदविण्यात आल्यानंतर सन २०१९-२०२० च्या प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर, २०१९ अखरे) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६० टक्केच्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) वितरीत केला जाईल.”** असे नमूद करण्यात आले आहे.

५. वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ४ च्या परिपत्रकानुसार निसर्ग संरक्षण व वन्यपशू व्यवस्थापन (२४०६ ०७७५) या लेखाशिर्षाअंतर्गत आता वितरणासाठी रु. ३८.०९ लक्ष निधी शिल्लक आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ७, ८ व ९ च्या पत्रान्वये सादर केलेला प्रस्ताव व निसर्ग संरक्षण व वन्यपशू व्यवस्थापन (२४०६ ०७७५) या योजनांतर्गत वितरणासाठी उपलब्ध असलेल्या निधीच्या मर्यादेत सदर शासन निर्णयान्वये खालील अटींच्या अधीन राहून सोबत जोडलेल्या परिपत्रकानुसार रु. ३८.०९ लक्ष निधीच्या प्रस्तावास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

I. सदर निधसाठी नियंत्रण अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील त्यांचेकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. त्यांनी योजनेअंतर्गत घावयाच्या कामांची अंमलबजावणी, कृती आराखड्याप्रामाणे, विहीत कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेलया मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सुचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. मंजूर निधीपैक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रण अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

II. सदर योजनेवर खर्ची टाकावयाची रक्कम सन २०१९-२० मध्ये लेखाशिर्ष मुख्य लेखाशिर्ष २४०६- वनीकरण व वन्यजीवन, ११० - वन्यजीवाचे संवर्धन (००) (०२) निसर्ग संरक्षण व वन्यपशू व्यवस्थापन (२४०६ ०७७५) अंतर्गत उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

III. योजनांतर्गत प्रस्तावीत कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची करण्यात यावा.

IV. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

V. कार्यबाबीमध्ये खरेदीचा समावेश असल्याने शासनाने विहित केलेल्या पद्धतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी. तसेच वित्त विभागाने साहित्य व इतर खरेदीच्या अनुषंगाने वेळोवेळी नर्गिमित केलेल्या प्रचलित शासन निर्णयानुसारच कार्यवाही करावी. वित्त विभागाने साहित्य व इतर खरेदीच्या अनुषंगाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या प्रचलित शासन निर्णयानुसारच कार्यवाही होत आहे व निसर्ग संरक्षण व वन्यपशू व्यवस्थापन (२४०६ ०७७५) या योजनेच्या व्याप्तीमध्ये सदर कामे आहेत यांची शहानिशा करुनच प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी निधी वितरीत करावा.

VI. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक - विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२ ,दिनांक - १७.०४.२०१५, वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक - अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०१९ व वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक - अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८.०७.२०१९ च्या परिपत्रकाचे काटेकोर पालन करावे .

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक- अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०१९ व दिनांक ०८.०७.२०१९ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११०७१५३८५२६६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL DESHBHRATAR

Digitally signed by SWAPNIL DESHBHRATAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=9add558653210cf44615291102f1bf143783e8403be64c06c7928e692d77c386, postalCode=400037, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=ce420aedd83773a67f861ab4c751835b3c5119f8fc41f2f3aa39bd7749dc02e0, ou=FOREST DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SWAPNIL DESHBHRATAR
Date: 2019.11.07 15:48:27 +05'30'

**(स्वप्निल देशभ्रतार)**
विशेष कार्य अधिकारी,
महसूल व वन विभाग

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व, नागपूर.
६. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), गडचिरोली.
७. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), अमरावती.
८. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), ठाणे.
९. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर.
१०. महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर.
११. ब-१, फ-२,फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

*********

**महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी-०५.१९/प्र.क्र. १४६ /फ-१, दिनांक :- ०७ नोव्हेंबर, २०१९ सोबतचे सहपत्र.( २४०६ ०७७५ लेखा शिर्ष )**

| अ.क्र. | वनवृत्त | रक्कम. (रु. लाखात) |
|---|---|---|
| १. | मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), गडचिरोली. | १०.९५ |
| २. | मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), अमरावती. | ४.८२ |
| ३. | मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), ठाणे. | ८.४० |
| ४. | वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर. | १३.९२ |
| | एकूण | ३८.०९ |

*******